नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील सह संचालक, नगर रचना संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बदली-५८२०/६५८/प्र.क्र.१०८/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २२ सप्टेंबर, २०२०.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार प्रशासकीय कारणास्तव खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील **सह संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) (वेतनश्रेणी : -एस) २७.रु (११८५००-२१४१००)** या संवर्गातील अधिकाऱ्यांची मध्यावधी बदली / प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती सु.ब.वैजापूरकर | सह संचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | सह संचालक, नगर रचना, नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक (प्र.नि.) |

०२. श्रीमती वैजापूरकर यांची पदस्थापना प्रतिनियुक्तीने करण्यात येत आहे, त्यांना प्रतिनियुक्तीच्या विहित अटी व शर्ती लागू राहतील.

०३. उपरोक्त अधिकारी ज्या कार्यालयात कार्यरत आहेत, त्या कार्यालय प्रमुखांनी हे आदेश प्राप्त होताच वरील अधिकाऱ्यांना बदलीने/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.

०४. या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे व संबंधित अधिकारी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या पदावर रुजू

झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०५.** सदरहू आदेशान्वये बदली/प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

**०६.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००९२२१६५२४६२०२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.22 17:36:22 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, नगर विकास महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

**१५.** प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
**१६.** प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
**१७.** विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
**१८.** विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
**१९.** जिल्हाधिकारी, औरंगाबाद/नाशिक.
**२०.** महानगर आयुक्त, नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक.
**२१.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
**२२.** सह संचालक, नगर रचना, (सर्व)
**२३.** जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/नाशिक.
**२४.** निवडनस्ती/नवि-२७.

***